**आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई येथे दाखल गु.र.क्र. २९/२०१९ मधून उद्भवणाऱ्या सर्व प्रकरणाचे न्यायालयीन कामकाज पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदिप घरत यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- एसपीपी-१०१९/प्र.क्र. ३२३/पोल-१०,**
गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०२०

<u>संदर्भ</u> :-१) शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी २०१९/यु.ओ.आर.५९/डी-१४, दिनांक १९.११.२०१९
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक १६जून, २०१७

**प्रस्तावना :-**

आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई येथे दाखल गु.र.क्र. २९/२०१९ मधून उद्भवणाऱ्या मा. विशेष एमपीआयडी न्यायालय मुंबई, मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदिप घरत यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आर्थिक गुन्हे विभाग, मुंबई येथे दाखल गु.र.क्र. २९/२०१९ मधून उद्भवणाऱ्या मा. विशेष एमपीआयडी न्यायालय मुंबई, मा. सत्र न्यायालय, मुंबई व मा. उच्च न्यायालय, मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड श्री. प्रदिप घरत यांना प्रतिदिन परिणामकारक सुनावणीकरीता खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर व्यावसायिक फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड श्री. प्रदिप घरत यांना अनुज्ञेय होणार नाहीत.

**मा. विशेष एमपीआयडी न्यायालय, व मा. सत्र न्यायालय, मुंबई**

१) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु. २०,०००/- (रुपये वीस हजार फक्त)
२) विचारविनीमय फी (प्रति बैठक) - रु. ३,०००/- (रुपये तीन हजार फक्त)

**मा. उच्च न्यायालय, मुंबई**

१) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रु. ३०,०००/- (रुपये तीस हजार फक्त)
२) विचारविनीमय फी (प्रति बैठक) - रु. ३,०००/- (रुपये तीन हजार फक्त)

२. अॅड. श्री. प्रदिप घरत यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान अॅड श्री. प्रदिप घरत यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्रमांक बी - १, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशिर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ४१२२९११, दिनांक ०३/१२/२०१९ रोजी मिळालेल्या शासन मान्यतेनुसार तसेच शासन निर्णय क्र. विअप्र-२०१५/प्र.क्र.२१/२०१५/विनियम, दिनांक २९.०७.२०१५ तसेच दिनांक १६/०६/२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२०१०१९१७४६०२२४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.19 17:47:49 +05'30'

**( किशोर भालेराव )**
उप सचिव (विधि), गृह विभाग

**प्रत,**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त, आर्थिक गुन्हे विभाग, पोलीस आयुक्त कार्यालय आवार, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई-१,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. अॅड श्री. प्रदिप घरत,६/६०३, क्षितीज को-ऑप हौ.सो.लि., माहिम कापड बझार रोड, स्टेप इन हॉटेल जवळ, माहिम, मुंबई- ४०००१६.
७. विधि व न्याय विभाग (का-१४), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती- पोल-१०.